अनधिकृत बांधकाम / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर पोलीस दलातील विविध संवर्गातील १०६ पदे निर्माण करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अेपीओ ३५१४/प्र. क्र. १०/पोल-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुख्य इमारत, मुंबई-३२
दिनांक: २० मे २०१५

वाचा:-

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/ नवि-२८, दिनांक २.३.२००९.
२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे जा. क्र. नमुंमपा/अतिक्रमण/११८७/२००९, दि.९.७.२००९.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे जा. क्र. नमुंमपा/अतिक्रमण/६१९/२०१३, दि.१९.३.२०१३.
४) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे जा. क्र. नमुंमपा/अतिक्रमण/१८४०/२०१३, दि.२९.८.२०१३.

प्रस्तावना:-

राज्यातील शहरांमध्ये अनधिकृत बांधकामे व अतिक्रमणाची समस्या दिवसेंदिवस अत्यंत गंभीर होत असल्याने, राज्यातील शहरांमधील अनधिकृत बांधकामे व अतिक्रमण नियंत्रणासाठी प्रभावी व सर्वंकष योजनेस दि. २५.२.२००९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली. त्यानुसार राज्यातील नागरी भागातील अनधिकृत बांधकामे/अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनाकरिता नागरी पोलीस यंत्रणा व स्वतंत्र विशेष पोलीस ठाणे निर्माण करण्याचा निर्णय घेण्यात येऊन तसा शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/ नवि-२८, दि.२.३.२००९ अन्वये निर्गमित केला आहे. या संदर्भात मुख्य सचिव यांच्याकडे दि. ५.१०.२०१२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये नागरी भागातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनाकरिता

विशेष पोलीस ठाण्याऐवजी पोलीस आयुक्तांच्या कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष कक्ष स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील नागरी पोलीस यंत्रणेसाठी व नागरी गुन्हयासाठी स्वतंत्र विशेष पोलीस ठाण्यासाठी मनुष्यबळ निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी उपरोक्त अनु. क्र. ३ येथील दि.१९.३.२०१३ च्या पत्रान्वये शासनास सादर केला. तसेच उपरोक्त अनु. क्र. ४ येथील दि.२९.८.२०१३ च्या पत्रान्वये सुधारित प्रस्ताव महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेच्या ठरावासह नगर विकास विभागास सादर केला आहे. त्यानुसार पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर नागरी पोलीस यंत्रणेसाठी ७८ व पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष पोलीस कक्षासाठी २८ अशी एकूण १०६ पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

उपरोक्त प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन, नवी मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली नवी मुंबई महानगरपालिका ("क" वर्ग) क्षेत्रात सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नागरी पोलीस यंत्रणेसाठी विविध संवर्गातील ७८ पदे निर्माण करण्यास तसेच पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष पोलीस कक्षासाठी २८ अशी एकूण १०६ पदे पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करुन प्रतिनियुक्तीने नवी मुंबई महानगरपालिकेमध्ये नियुक्त करण्यास खालील अटींस अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर अटी / शर्ती नवी मुंबई महानगरपालिकेवर बंधनकारक राहतील.

१) नागरी पोलीस यंत्रणेसाठी व आर्थिक गुन्हे शाखेशी संलग्न स्वतंत्र विशेष कक्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या पोलीस अधिकारी / कर्मचारी यांच्यावर प्रशासकीय नियंत्रण पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे राहील.

२) मंजूर अधिकारी व कर्मचारी यांच्या पदाचे वेतन व भत्ते, निवृत्तीवेतन अंशदान व इतर आवर्ती /अनावर्ती खर्च शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक-कडोंमपा-१००६/प्र.क्र.१९२/२००६/नवि-२८, दिनांक २.३.२००९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे नवी मुंबई महानगरपालिकेने करावयाचा आहे.

३) नागरी पोलीस यंत्रणा व विशेष कक्षासाठी नागरी गुन्ह्याविषयी माहिती व्हावी याकरिता महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम तसेच त्यांच्याशी संबंधित इतर अधिनियमांमधील तरतुदीविषयीचे प्रशिक्षण सत्र आयोजित करण्याची जबाबदारी नवी मुंबई महानगरपालिकेची राहील.

४) राज्य शासनाच्या नियमाप्रमाणे महागाई भत्ता, आहार भत्ता, सार्वजनिक सुट्टी भत्ता, वाहन भत्ता, रजा, भविष्य निर्वाह निधी व इतर भत्ते देय राहतील.

५) घरभाडे मुक्त निवास व्यवस्था पुरविण्याची जबाबदारी नवी मुंबई महानगरपालिकेची राहील. जेथे घरभाडे मुक्त निवास व्यवस्था उपलब्ध नसेल तेथे राज्य शासनाच्या नियमाप्रमाणे घरभाडे भत्ता देय राहील.

६) राज्य शासनाने वेळोवेळी गठित केलेल्या वेतन आयोगाने शिफारस केल्यानुसार संबंधित पदाप्रमाणे वेतन, विशेष वेतन व इतर सर्व अनुज्ञेय भत्ते देय राहतील.

७) पोलीस अधिकारी / कर्मचारी यांना गणवेश भत्ता, दारुगोळा, शरीर संरक्षण किट, लाठी, शस्त्र, हेल्मेट, प्लास्टिक शिल्ड, वाहने आणि इतर आवश्यक संरक्षणविषयक साधनसामुग्रीसाठी लागणारा खर्च नवी मुंबई महानगरपालिकेने आगाऊ उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

८) पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्याकरिता कार्यालयीन जागा, फर्निचर, आवश्यक वाहने, दूरध्वनी, संगणक, इंटरनेट, बिनतारी संदेश यंत्रणा तसेच दैनंदिन लागणारी कार्यालयीन साधनसामुग्री नवी मुंबई महानगरपालिका यांनी उपलब्ध करुन द्यावी.

९) सदर पदांवरील वेतन व वेतनेतर खर्चाची आगावू तिमाही रक्कम नवी मुंबई महानगरपालिकेने पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्याकडे वेळोवेळी जमा करावी.

१०) उपरोक्त अटीमधील काही खर्चाच्या बाबी राहिल्या असतील तर पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांनी मागणी केल्यावर संबंधित महानगरपालिका यांनी त्याची भरपाई करणे बंधनकारक राहील.

११) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करावयाची आहेत त्या प्रयोजनासाठीच वापरणे बंधनकारक राहील.

२. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६३/१४/व्यय-७, दि.२३.११.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२०१६०२२१५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: CN = KADAM DATTATRAY HANMANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPT,CID - 918120
Date: 2015.05.20 16:11:35 +05'30'

**(द. ह. कदम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. पोलीस आयुक्त, नवी मुंबई
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका
८. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१०.कोषागार अधिकारी, ठाणे
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
१३.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-३,७/सेवा-९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
१४.गृह विभागातील सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव /कार्यासन अधिकारी
१५.निवडनस्ती, पोल-३

## विवरणपत्र-अ

अनधिकृत बांधकाम / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी नवी मुंबई महानगरपालिका ("क" वर्ग) क्षेत्रात नागरी पोलीस यंत्रणेसाठी तसेच आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करावयाची पदे

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनसंरचना |
|---|---|---|---|
| १ | पोलीस उपअधिक्षक/ सहायक पोलीस आयुक्त | १ | पे बॅण्ड १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० |
| २ | पोलीस निरीक्षक | १ | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ५००० |
| ३ | पोलीस उपनिरीक्षक | ६ | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० |
| ४ | पोलीस हवालदार | ६ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४००+ विशेष वेतन ५०० |
| ५ | पोलीस नाईक | ४ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४००+ विशेष वेतन २०० |
| ६ | पोलीस शिपाई (सशस्त्र) | ३६ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २०००+ विशेष वेतन ५०० |
| ७ | पोलीस शिपाई (महिला) | २४ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २०००+ विशेष वेतन ५०० |
| | **एकूण** | **७८** | |

## विवरणपत्र-ब

अनधिकृत बांधकाम / अतिक्रमण नियंत्रण व निर्मूलनासाठी नवी मुंबई महानगरपालिका ("क" वर्ग) क्षेत्रात पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे (EOW) शाखेत नागरी गुन्हयांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी स्थापन करावयाच्या स्वतंत्र कक्षासाठी आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करावयाची पदे

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनसंरचना |
|---|---|---|---|
| १ | सहायक पोलीस निरीक्षक | १ | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० |
| २ | पोलीस उपनिरीक्षक | १ | पे बॅण्ड ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० |
| ३ | सहायक पोलीस उपनिरीक्षक | २ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २८०० |
| ४ | पोलीस हवालदार (सशस्त्र) | ६ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २४००+ विशेष वेतन ५०० |
| ५ | पोलीस शिपाई (सशस्त्र) | १४ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे २०००+विशेष वेतन ५०० |
| ६ | कनिष्ठ लिपिक | २ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० |
| ७ | वाहन चालक | २ | पे बॅण्ड ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० |
| | **एकूण** | **२८** | |